**पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांच्या आस्थापनेवरील विविध संवर्गांतील १,१२६ अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## गृह विभाग

**शासन निर्णय क्रमांक : टिआरए-२०२३/प्र.क्र.३३१/पोल-८**

२ रा मजला, हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२

दिनांक : **२०** मार्च, २०२४.

वाचा : १) शासन निर्णय, गृह विभाग क्र.टिआरए-२०२३/प्र.क्र.३३१/पोल-८, दि.२६.०९.२०२३.

२) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई कार्यालयाचे पत्र जा.क्र.पोआ/कक्ष-२(६)/रवका/पमोवा/३५/२०२४,दि.१३.०२.२०२४.

३) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क.,दि.२१.०२.२०२४

**प्रस्तावना :-**

पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांच्या आस्थापनेवर निर्माण करण्यात आलेल्या विविध संवर्गातील १,१२७ अस्थायी पदांना, गृह विभागाच्या संदर्भ क्र. १ च्या शासन निर्णयान्वये दि.०१.०९.२०२३ ते दि.२९.०२.२०२४ या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यात आलेली होती. सदर मुदतवाढ संपुष्टात आली असल्याने, संदर्भ क्र. २ येथील प्रस्तावान्वये पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांनी सदर ११२६ अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याची विनंती केली आहे.

वित्त विभागाच्या संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णयान्वये सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच, यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु, ज्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२४ ते दि.३१.०८.२०२४ या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यात आली आहे. त्यानुसार उपरोक्त नमूद ११२६ अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

या शासन निर्णयासोबतच्या विवरणपत्रात दर्शविण्यात आलेल्या पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांच्या आस्थापनेवरील विविध संवर्गातील १,१२६ अस्थायी पदांना शासन निर्णय वित्त विभाग दि.२१.०२.२०२४ मधील अटींच्या अधिन राहून **दि.०१.०३.२०२४ ते दि.३१.०८.२०२४ या कालावधीसाठी** मुदतवाढ देण्यात येत आहे.

२. यासाठी होणारा खर्च गृह विभाग, मागणी क्रमांक : बी-१, "२०५५ पोलीस १०८ राज्य मुख्यालय पोलीस (०२) शहर पोलीस (०२) (०१) आस्थापना" या लेखाशिर्षाखालील सन २०२४-२०२५ या वर्षीच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा व हा खर्च त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

३. सदरचा आदेश, शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.२१.०२.२०२४ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे. सदरची अस्थायी पदे सहा महिन्यापेक्षा अधिक काळासाठी रिक्त राहणार नाहीत या अटीच्या अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा सांकेतांक २०२४०३२०१३१२३५०७२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

CHHAYA NATHU MALI

Digitally signed by CHHAYA NATHU MALI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=cd4e9f6041c76a9f3fd5cbcbc45affce68bbd6f32230f05b4a2b54b875937776, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B20C807A33573110F6D8441C862B04F58811935279DCAD666C42A2FABC6C24E8, cn=CHHAYA NATHU MALI
Date: 2024.03.20 13:21:50 +05'30'

**( छाया न. माळी )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. प्रधान सचिव (विशेष), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
४. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई.
५. महालेखापाल-१ (लेखा परिक्षा), मुंबई.
६. महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), नागपूर.
७. महालेखापाल-२ (लेखा परिक्षा), नागपूर.
८. कार्यासन अधिकारी (व्यय-७), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. कार्यासन अधिकारी (आ.पु.क.) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. कार्यासन अधिकारी (पोल-३), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. निवडनस्ती पोल-८, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.

**शासन निर्णय, गृह विभाग, क्र. टिआरए-२०२३/प्र.क्र.३३१/पोल-८, दिनांक २० मार्च, २०२४ चे सहपत्र**
**पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांच्या आस्थापनेवरील विविध संवर्गातील १,१२६ अस्थायी पदांना**
**दि. ०१.०३.२०२४ ते दि. ३१.०८.२०२४ या कालावधीसाठी मुदतवाढ देण्याबाबतचे पदांचे विवरणपत्र**

| अ. क्र. | पोलीस आयुक्त टि.ई.क्रमांक | विषय | प्रस्तावित पदे | | पदे निर्माण केल्याचा गृह विभाग शासन निर्णय |
|---|---|---|---|---|---|
| | | | पदनाम | पदसंख्या | |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | ७७३ | वाहतूक नियंत्रण शाखेसाठी पोलीस अधिकारी दर्जाच्या संख्येत कर्मचारी / वाढ | पोलीस निरीक्षक<br>पोलीस उप निरीक्षक<br>सहा.पोलीस उपनिरीक्षक<br>पोलीस हवालदार<br>पोलीस हवालदार लेखनिक<br>पोलीस शिपाई<br>पोलीस शिपाई लेखनिक<br>पोलीस शिपाई चालक<br>**एकूण** | ४<br>२५<br>१२<br>४८<br>१<br>१८०<br>१<br>१३<br>**२८४** | टिआरए ०१८६/२७५३/२/पोल-८, दि.२३/०९/१९८८.<br><br>एपीओ २६९२/प्र.क्र.४६७/पोल-३, दि.०५/०७/१९९२ अन्वये एक पद दि.५.०७.१९९२ शासनास प्रत्यर्पित केले. |
| २ | ८३२ | वाहतुक शाखेसाठी चालक पदे निर्माण करण्याबाबत | पोलीस शिपाई चालक<br>**एकूण** | २७<br>**२७** | क्र.टिआरए १३९१/१९/पोल-८, दि.२९/०६/१९९२. |
| ३ | ८४२ | बेलोबॉय हे पद कायम स्वरुपी निर्माण करण्याबाबत | बेलोबॉय कम शिपाई<br>**एकूण** | ०<br>**०** | क्र.टिआरए १६९१/३/पोल-८, दि.११/११/१९९२<br>शा.नि.क्र.सीटीई-०४२२/प्र.क्र.३०/पोल-३,दि.३०.०६.२०२३ अन्वये पोलीस घटक कार्यालयाच्या आस्थापनेवरील पदांच्या सुधारीत आकृतीबंधास मान्यता देण्यात आली असून त्यानुसार घट दर्शविण्यात आलेल्या व **सद्यस्थितीत या कार्यालयाच्या आस्थापनेवर रिक्त असलेले बेलोबॉय हे पद कमी करण्यात येत आहे.** |
| ४ | ८८६ | बृहन्मुंबई पोलीस वाहतुक शाखेसाठी नवीन पदे निर्माण करणे | सहा.पोलीस उपनिरीक्षक<br>पोलीस हवालदार<br>पोलीस नाईक<br>पोलीस शिपाई<br>**एकूण** | २६<br>१०७<br>०<br>६३<br>**१९६** | क्र.टिआरए १५९४/४९/पोल-८, दि.२२/०८/१९९५. |

**शासन निर्णय, गृह विभाग, क्र. टिआरए-२०२३/प्र.क्र.३३१/पोल-८, दिनांक २० मार्च, २०२४ चे सहपत्र**
**पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांच्या आस्थापनेवरील विविध संवर्गातील १,१२६ अस्थायी पदांना**
**दि. ०१.०३.२०२४ ते दि. ३१.०८.२०२४ या कालावधीसाठी मुदतवाढ देण्याबाबतचे पदांचे विवरणपत्र**

| अ. क्र. | पोलीस आयुक्त टि.ई.क्रमांक | विषय | प्रस्तावित पदे | | पदे निर्माण केल्याचा गृह विभाग शासन निर्णय |
|---|---|---|---|---|---|
| | | | पदनाम | पदसंख्या | |
| १ | २ | २ | ३ | ४ | ५ |
| ५ | ९४० | महिला अत्याचार प्रतिबंधक कक्षासाठी पदे निर्माण करणे | पोलीस शिपाई चालक<br>**एकूण** | १<br>**१** | क्र.पीपीए १३९४/५/भाग-४/पोल-८, दि.२७/०९/२००२. |
| ६ | ९४३ | बृहन्मुंबई पोलीस वाहतुक शाखेसाठी नवीन पदे निर्माण करणे | पोलीस उप निरीक्षक<br>पोलीस शिपाई<br>**एकूण** | २<br>७<br>**९** | क्र.टिआरए ०१०३/६६९/प्र.क्र.१०/पोल-८, दि.१९/०९/२००३<br>पुरक पत्रक समक्रमांक दिनांक १९.०९.२००३ |
| ७ | ९४५ | न्यायाधिन कैद्यांची न्यायालयात तथा रुग्णालयात ने आण करण्यासाठी पदे-निर्माण करणे | पोलीस निरीक्षक<br>सहाय्यक पोलीस निरीक्षक<br>पोलीस उप निरीक्षक<br>सहा.पोलीस उप निरीक्षक<br>पोलीस हवालदार<br>पोलीस शिपाई<br>**एकूण** | १<br>२<br>३५<br>३५<br>११०<br>४२६<br>**६०९** | एमआयएस ०१०४/प्र.क्र.७७/२/पोल-८, दि.१२/०७/२००४. |
| | | | **एकूण पदे** | **११२६** | |

CHHAYA NATHU MALI

Digitally signed by CHHAYA NATHU MALI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT,
2.5.4.20=cd4e9f6041c76a9f3fd5cbcbc45affce68bbd6f32230f05b4a2b54b875937776, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=B20C807A33573110F6D8441C862B04F58811935279DCAD666C42A2FABC6C24E8, cn=CHHAYA NATHU MALI
Date: 2024.03.20 13:22:11 +05'30'

**( छाया न. माळी )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**